**महाराष्ट्र शासन**

दुरध्वनी/फॅक्स क्र. ०२२-२२०४८२४७
ई-मेल- dokh.rfd@maharashtra.gov.in

क्रमांक :गौखनि-३३/०३१८/प्र.क्र.१३८/ख
महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० जानेवारी, २०१९.

**विषय**:- गौण खनिज-अहमदनगर

सन २०१४-२०१५ या वर्षाकरिता मौजे कोपरे, ता.राहुरी, जि.अहमदनगर या वाळूगटाच्या लिलावापोटी शासनजमा केलेली रक्कम परत करणेबाबत.

श्री.साईश्रध्दा ट्रान्सपोर्ट प्रो.नंदू कचरु गागरे

**शासन ज्ञापन :-**

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना त्यांचे पत्र क्र.गौख/कार्या ४ क/१२८/२०१७, दि.१९/१/२०१८ व पत्र क्र.गौख/कार्या ४ क/१०८/२०१७, दि.२४/१/२०१८ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१४-१५ या वर्षाकरिता मौजे कोपरे, ता.राहुरी, जि.अहमदनगर या वाळूगटाचा लिलाव रुपये ८५,५१,०००/-इतक्या सर्वोच्च बोलीस श्री.साईश्रध्दा ट्रान्सपोर्ट तर्फे प्रो.नंदू कचरु गागरे यांना मंजूर करण्यात आला होता. त्यानुसार लिलावधारकाने लिलावाची रक्कम शासनजमा केली होती.

०२. लिलावधारक यांना सदर वाळूगटाचा ताबा देण्यास स्थानिक ग्रामस्थांचा विरोध होता. तसेच सदर वाळूगटाच्या लिलावाविरोधात ग्रुप ग्रामपंचायत, कोपरे व शेणवडगांव यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.४८०७/२०१५ दाखल केली. सदर वाळूगटातून उत्खननास सुरुवात झाल्यास कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होण्याची शक्यता असल्याने सदर वाळूगटाचा ताबा लिलावधारक यांना देण्यात आलेला नाही.त्यामुळे श्री.साईश्रध्दा ट्रान्सपोर्ट तर्फे प्रो.नंदू गागरे यांनी उक्त वाळू लिलावाची रक्कम परत मिळणे अथवा मौजे कोपरे ऐवजी मौजे कोल्हार येथील वाळू लिलाव मंजूर करण्याची विनंती केली. तथापि, मौजे कोल्हार येथील वाळू लिलावास यापुर्वीच मा.उच्च न्यायालयाने दि.५/५/२०१५ चे निर्णयानुसार वाळू लिलावाची प्रक्रिया पूर्ण करावी. मात्र वाळू उत्खनन करण्याबाबतचे पुढील आदेश होईपर्यंत निर्गमन करु नये असा निर्णय दिला होता.

०३. लिलावधारक यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.१४९०७/२०१७ दाखल करुन मौजे कोपरे, ता.राहुरी या लिलावापोटी भरलेली रक्कम परत मिळावी अशी विनंती केली. त्यानुषंगाने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.२०/१२/२०१७ च्या निर्णयानुसार संबंधित लिलावधारक यांना मंजूर केलेल्या वाळू लिलावास संबंधित गावकऱ्यांच्या विरोधामुळे वाळू उत्खनन करता आले नाही. त्यामुळे लिलावापोटी भरलेली रक्कम लिलावधारकास परत करण्याबाबत योग्य तो निर्णय ४ महिन्यात घ्यावा, असे आदेश देऊन याचिका निकाली काढली आहे. मौजे कोपरे, ता.राहुरी या वाळूगटाच्या लिलावधारकास उक्त वाळूगटाचा ताबा दिलेला नसल्याने त्यांनी शासनजमा केलेली रक्कम परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. सबब, लिलावधारक श्री.साईश्रध्दा ट्रान्सपोर्ट प्रो.नंदू गागरे यांना देय असलेली रु.८५,५१,०००/- (रुपये पंच्याऐंशी लक्ष एक्कावन हजार फक्त) इतकी रक्कम त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०५. या बाबीवर होणारा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता लेखाशीर्ष "०८५३- अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग- वजा परतावे (००)(०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०१८/सं.क्र.२२९/व्यय-९,दि.२९ मे,२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संकेतांक २०१९०१३०१६४६०७७९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2019.01.30 16:57:00 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**

अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी, अहमदनगर.

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर

५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७) निवडनस्ती (कार्यासन "ख"), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.